**<u>आषाढीवारी - २०२५</u>**

आषाढी एकादशी निमित्त पुणे, सातारा,सोलापूर या जिल्हयांतून मार्गक्रमण करणाऱ्या विविध संतांच्या पालख्यांसोबत असणाऱ्या भाविकांना मुक्कामाच्या ठिकाणी **तात्पुरत्या शौचालयाची** व्यवस्था व इतर स्वच्छतेविषयक सुविधा पुरविण्याच्या कामांना जिल्हा परिषद, **पुणे** यांना निधी वितरीत करणेबाबत.

## महाराष्ट्र शासन

### ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२५/ई-११५९४१७/यो-११**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१
दिनांक: ११ जून, २०२५

**<u>संदर्भ</u>:** मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. पुणे यांचे जा.क्र./जि.प./लेखा-६/१२०१/२०२५ दि. ०९.०६.२०२५. व जा.क्र.जि.प/स्वभामि/ME/पालखी-२५/निमा/३३७/२०२५ दि. ०६.०६.२०२५ रोजीचे पत्र.

**<u>प्रस्तावना</u> :-**

विधानमंडळाच्या सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांनी त्यांच्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये आषाढी एकादशी निमित्त पुणे, सातारा, सोलापूर या जिल्हयांतून मार्गक्रमण करणाऱ्या विविध संतांच्या पालख्यांसोबत असणाऱ्या भाविकांकरीता तात्पुरती स्वच्छतागृहे उपलब्ध करुन देण्याची घोषणा केली होती. त्यानुषंगाने या प्रयोजनासाठी सन २०१७-१८ पासून निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. त्यानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी उपरोक्त संदर्भाधिन पत्रान्वये भाविकांकरीता तात्पुरते स्वच्छतागृह भाडेतत्वावर उपलब्ध करून देण्यासाठी व इतर स्वच्छतेविषयक सुविधा पुरविण्यासाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देणेबाबत विनंती केली आहे. त्यानुसार जिल्हा परिषद, पुणे यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

आषाढी एकादशीनिमित्त पुणे, सातारा, सोलापूर या जिल्हयातून मार्गक्रमण करणाऱ्या विविध संतांच्या पालख्यासोबत असणाऱ्या भाविकांना स्वच्छता सुविधा पुरविण्यासाठी भाडेतत्वावर तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर स्वच्छतेविषयक सुविधा पुरविण्याच्या कामांकरिता जिल्हा परिषद, पुणे यांनी **रु. १७,५२,७६,०००/- (रू. सतरा कोटी बाव्वन्न लक्ष शहात्तर हजार फक्त)** इतक्या निधीची मागणी केली आहे. सदर मागणीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | जिल्हा परिषद | कामांचे नाव | रक्कम (रु.) |
|---|---|---|---|
| १. | जिल्हा परिषद, पुणे | तात्पुरते स्वच्छतागृह | १३,७५,५१,०००/- |
| | | सफाई कामगार | ४७,२५,०००/- |
| | | प्रचार प्रसिद्धी | २०,००,०००/- |
| | | पिण्याचे पाणी सुविधा | २,५०,००,०००/- |
| | | मौजे नीरा ता. पुरंदर येथील पालखी तळ कॉंक्रीटीकरण करणे. | ६०,००,०००/- |
| | | **एकूण** | **१७,५२,७६,०००/-** |

२. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास या योजनेंतर्गत, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२५१५ २५२१) या लेखाशीर्षाखाली रु.१००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

३. सद्यस्थितीत २५१५ २५२१ लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून उपरोक्त मंजूर **रु. १७,५२,७६,०००/-** इतक्या रकमेच्या ७५ % म्हणजेच **रु. १३,१४,५७,०००/- (रु. तेरा कोटी चौदा लक्ष सत्तावन्न हजार फक्त)** इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर निधी वितरीत करताना, ज्या कामांसाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे त्याच कामांवर खर्च करण्याची जबाबतदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांची राहील. सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई व या विभागास सादर करावीत. वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व निर्मलवारीत (तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा) या बाबीवर झालेल्या एकूण खर्चाचा सविस्तर तपशील शासनास सादर केल्यानंतर उर्वरित निधीचे वितरण करण्यात येईल.

५. सदर खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना/जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००) (०७) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षात खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३२२/२०२५/व्यय-१५ दि. २९.०४.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५ अन्वये अटींची व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१११११२३८२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701FC3DB9C38A46F4CD82E1E450B51A9E92EEDE8C323934F82EDB538D3B20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.06.11 17:09:12 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
९. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे,
१०.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे,
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे,
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे,
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१४. अवर सचिव, नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,
१५. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय १५,अर्थसं १६,अर्थसं १७) मंत्रालय, मुंबई ३२,
१६. कक्ष अधिकारी, कार्या- वित्त-१, ग्राम विकास विभाग,
१७.निवड नस्ती (का-यो-११).